**प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत सद्यस्थितीतील पाककृतीमध्ये सुधारणा करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ- २०२२/प्र.क्र.११७/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १५ मार्च, २०२३

**संदर्भ:-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०१०/प्र.क्र.१८/प्राशि-४, दि.०२ फेब्रुवारी, २०११.
२) शिक्षण संचालक (प्राथ.) यांचा प्रस्ताव क्र.शापोआ/समिती/२०२२-२३/०९८३, दि.१०/०३/२०२३.
३) केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सूचना दि.२१ डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना:-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत संदर्भाधिन दि.०२ फेब्रुवारी, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या आहाराच्या पाककृतीची निश्चिती करण्यात आली आहे. मागील काही वर्षामध्ये प्रसिध्द झालेल्या अनेक आरोग्य विषयक अहवालामधून विद्यार्थ्यांच्या शरीरामध्ये लोहाचे प्रमाण कमी असणे, विद्यार्थ्यांचा Body Mass Index (BMI) कमी/जादा असणे आदी बाबी निदर्शनास आल्या आहेत. तसेच, केंद्र शासनाने योजनेंतर्गत स्थानिक उपलब्ध होणाऱ्या अन्नपदार्थांचा व तृणधान्याचा समावेश करण्याबाबतच्या शक्यता पडताळून पाहण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुषंगाने प्रस्तुत योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या आहारामध्ये स्थानिक उपलब्ध अन्नधान्य, तृणधान्य व अन्य पदार्थांचा समावेश करुन आहाराचा दर्जा व पौष्टिकता वृध्दीगत करण्याच्या दृष्टीने याबाबत शास्त्रीय अभ्यास करण्यासाठी आरोग्य, आहार, शिक्षण क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्तींच्या समितीचे गठन करणे आवश्यक आहे. सदर समितीच्या अहवालानुसार विद्यार्थ्यांना अधिक पौष्टिक व सकस आहार देण्यासाठी प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत पाककृतीमध्ये सुधारणा करता येणे शक्य आहे. तद्दनुषंगाने उपरोक्त नमूद क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्तींची समिती गठीत करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधिन दि.१० मार्च, २०२३ रोजीच्या पत्रान्वये शिक्षण संचालक (प्राथ.) यांनी शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने प्रस्तुत विषयाबाबत समिती गठीत करण्यास तसेच, समितीची कार्यकक्षा ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत सद्यस्थितीतील पाककृतीमध्ये सुधारणा सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समिती सदस्याचे नाव व पद | हुद्दा |
|---|---|---|
| १. | शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २. | श्री. विष्णू मनोहर, आहार तज्ज्ञ | सदस्य |
| ३. | श्री. उज्वल नागेश्वर, अध्यक्ष, कोल्हापूर हॉटेल मालक संघ | सदस्य |
| ४. | श्री. प्रसाद कुलकर्णी, आघारकर संशोधन संस्था, पुणे | सदस्य |
| ५. | श्रीम. पुनम कदम आहार तज्ज्ञ, ग्रामीण रुग्णालय, बारामती | सदस्य |
| ६. | श्री. नितिन वाळके, कार्यवाहक, व्यापारी महासंघ, सिंधुदुर्ग | सदस्य |
| ७. | डॉ. अर्चना ठोंबरे, पोषण तज्ज्ञ, पुणे | सदस्य |
| ८. | महाराष्ट्र हॉटेल मॅनेजमेंट आणि केटरींग टेक्नॉलॉजी संस्था, पुणे यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९. | श्री. वैभव बारेकर, अधिक्षक, प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, गडचिरोली | सदस्य |
| १०. | श्री. देविदास कुलाळ, राज्य समन्वय अधिकारी, प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

i. प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत सध्यस्थितीत देण्यात येणारा पोषण आहार अधिक पौष्टिक, रुचकर व दर्जेदार होण्यासाठी वेगवेगळ्या पाककृती सुचविणे. तसेच, सदर पाककृतीमधील धान्यादी वस्तूचे प्रमाण निश्चित करुन देणे.

ii. विद्यार्थ्यांच्या शरीरातील लोहाचे प्रमाण वाढविणे व Body Mass Index (BMI) सुधारण्याच्या अनुषंगाने अभ्यास करुन आहाराच्या बदलाबाबत उपाययोजना सुचविणे.

iii. स्थानिक पातळीवर मिळणारे अन्नधान्य, भाज्या, फळे इ.च्या आधारित पाककृतींचा समावेश करण्याबाबत शिफारस करणे.

iv. तांदुळ व तृणधान्यापासून मुख्य आहाराव्यतिरिक्त अधिक प्रक्रिया न करता तयार होणारे प्रथिने, जीवनसत्वयुक्त पदार्थ सुचविणे.

v. प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत इतर राज्यातील आहारासंदर्भात नाविन्यपूर्ण उपक्रमांचा अभ्यास करुन राज्यामध्ये सदर उपक्रम राबविण्याबाबत अभिप्राय देणे.

vi. प्रत्येक शाळेमधून विद्यार्थ्यांना नियमित आहार उपलब्ध होईल याकरीता सर्व बाबींचा विचार करुन धोरणात्मक उपाययोजना सुचविणे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१५१८०८०७०३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

IMTIYAZ MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.03.16 16:26:41 +05'30'

**(इ.मु.काझी)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१४) शिक्षणाधिकारी (बृहन्मुंबई), बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१६) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई
१७) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती - एस.डी. ३.